**“मा.बाळासाहेब ठाकरे माजी सैनिक व त्यांच्या विधवा पत्नीला मालमत्ता कर माफी योजना”, या योजनेंतर्गत राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील माजी सैनिकांना मालमत्ता करातून सूट देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
४ था मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. ०९ सप्टेंबर, २०२०

**वाचा :-**
१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२० दि. ०५.०४.२०१६
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२० दि. ०७.०४.२०१६
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२० दि. ०९.०१.२०१७

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील मालमत्ता कराबाबत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९, मुंबई महापालिका अधिनियम १८८८ व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मध्ये तरतुदी करण्यात आलेल्या आहेत. तसेच शासन निर्णय दि. ०५.०४.२०१६ व ०७.०४.२०१६ अन्वये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात राहणाऱ्या केवळ संरक्षण दलातील शौर्य पदक धारकांना व माजी सैनिकांच्या विधवा पत्नीच्या नावावर असलेल्या मालमत्तांना तसेच दि. ०९.०१.२०१७ च्या शासन निर्णयानुसार संरक्षण दलातील अविवाहित शहिद झालेल्या सैनिकांच्या नामनिर्देशित मालमत्तांना मालमत्ता करातून सूट देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

माजी सैनिकांनी देशासाठी प्राणाची बाजी लावून जीवाची पर्वा न करता निस्वार्थीपणे देशाचे संरक्षण केले आहे. त्यांनी केलेले देशाची सेवा व विविध स्तरावरुन प्राप्त झालेली मागणी विचारात घेता सर्व माजी सैनिकांचे मनोबल उंचावून त्यांना उचित सन्मान देण्याच्या दृष्टीकोनातून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रात वास्तव्य करणाऱ्या सर्व माजी सैनिकांना मालमत्ता करातून सूट देणे आवश्यक आहे.

“मा.बाळासाहेब ठाकरे माजी सैनिक व त्यांच्या विधवा पत्नीला मालमत्ता कर माफी योजना”, ही योजना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये राबविण्याचे प्रस्तावित असून या योजनेंतर्गत राज्यातील नागरी स्थानिक

स्वराज्य संस्थांमधील सर्व माजी सैनिकांच्या मालमत्तांना मालमत्ता करात सूट देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील मालमत्ता कराबाबत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९, मुंबई महापालिका अधिनियम १८८८ व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मध्ये तरतुदी करण्यात आलेल्या आहेत. प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेऊन "मा.बाळासाहेब ठाकरे माजी सैनिक व त्यांच्या विधवा पत्नीला मालमत्ता कर माफी योजना", या योजनेंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रात वास्तव्य करणाऱ्या सर्व माजी सैनिकांना मालमत्ता करातून सूट देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. अशा कर माफीस पात्र ठरणाऱ्या व्यक्तीने जिल्हा सैनिक कल्याण अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहिल.

सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०७१७१०२३१८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Shankar Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=65f3f4695111ee4b72455e21ef9099788d9b999ffbcaaa070711f14d2a10e138, serialNumber=c83ebbb277c2e72c85231b87f684c424a13c398a4f921b6d167a8c859e9817f5, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2020.09.10 13:02:33 +05'30'

(शं. त्र्यं. जाधव)

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई-३२
३) मा.मंत्री / राज्यमंत्री नगर विकास विभाग यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२
४) मा. मंत्री कृषि, माजी सैनिक कल्याण यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२
५) प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय , मुंबई-३२
७) आयुक्त, सर्व महानगरपालिका
८) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी (नगर विकास)
११) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद / नगर पंचायती
१२) निवडनस्ती (नवि-२०).